संचालक, सामाजिक वनीकरण व वनसंरक्षक पुणे
जाहिरात व प्रसिध्दी **या योजनेसाठी**
**सन २०१०-११ करीता प्रशासकीय व वित्तीय**
**मान्यता आणि लेखा अनुदान वितरणास मंजुरी.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एसएलएफ-२०१०/ प्र.क्र. ३९ / जल-१२,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : १६ एप्रिल, २०१०**

**संदर्भ :-**

१) ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्र. एसएलएफ-१८९२/प्र.क्र.१५९/जल-१४, दि.२८ जानेवारी, १९९३
२) ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्र. एसएलएफ-१८९३/प्र.क्र.३०/जल-१२, दि.२६ ऑगस्ट, १९९३
३) ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्र. एसएलएफ-१८९८/प्र.क्र.२५७/जल-१२, दि. १ जानेवारी,१९९९
४) ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्र. एसएलएफ-२००९/प्र.क्र.३२/जल-१२, दि. २८ एप्रिल,२००९
५)संचालक, सामाजिक वनीकरण,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्र. कक्ष-८/चा.बा./प्र.क्र.१/१६/०९-१०,दि. ३एप्रिल,२०१०
६) वित्त विभाग, परिपत्रक क्र.अंदाज-२०१० /प्र.क्र ६५/२०१०/अर्थसंकल्प-३, दि. ३ एप्रिल,२०१०
७) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.असक-२०१०/प्र.क्र.३२/जल-११, दि. ८एप्रिल,२०१०

**प्रस्तावना :**

सामाजिक वनीकरणाचे महत्व व वनीकरणाच्या पध्दतीची माहिती सामान्य नागरीकांना देऊन वृक्ष लागवड व संवर्धन करण्याबाबत त्यांना उद्युक्त करण्यासाठी सामाजिक वनीकरणांतर्गत जाहीरात, विक्री, प्रशिक्षण व प्रसिध्दी हा कार्यक्रम सन १९९२-९३ पासून कार्यान्वित करण्यात आला आहे. ही योजना सन २००९-१० मध्ये राबविण्यास संदर्भाधीन दिनांक २८ एप्रिल, २००९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजना सन २०१०-११ या आर्थिक वर्षात चालू ठेवून त्या करीता अनुदान वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सामाजिक वनीकरणांतर्गत संचालक, सामाजिक वनीकरण व वनसंरक्षक,पुणे- जाहिरात व प्रसिध्दी ही योजना सन २०१०-११ या आर्थिक वर्षात पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१०-११ या वित्तीय वर्षात सामाजिक वनीकरण विभागांतर्गत संचालक, सामाजिक वनीकरण व वनसंरक्षक, पुणे- जाहिरात व प्रसिध्दी ह्या कार्यक्रमासाठी रु. १३०.०० लाख नियतव्यय उपलब्ध असून, हा नियतव्यय मार्च २०१० च्या अधिवेशनात अर्थसंकल्पित झाला आहे. या अर्थसंकल्पीत तरतुदीपैकी लेखानुदान म्हणून रु. २१.६७ लाख एवढा निधी उपलब्ध आहे. वर नमुद दिनांक ८ एप्रिल, २०१० च्या शासन निर्णयान्वये कळविल्याप्रमाणे लेखानुदानाचा अधिनियम विधानमंडळाने पारित केला असल्याने लेखानुदानाच्या तरतुदी वितरित करण्यास मान्यता आहे.

त्यानुसार माहे एप्रिल व मे २०१० या दोन महिन्यांकरिता लेखानुदानाने मंजूर रु. २१.६७ लाख ( रुपये एकविस लाख सदुसष्ठ हजार फक्त) इतका निधी मासिक निधी विवरणपत्रानुसार खर्च करण्याच्या अटीच्या अधीन राहून सदर योजनेसाठी सन २०१०-११ या आर्थिक वर्षात प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. हा निधी खर्च करण्यासाठी संचालक, सामजिक वनीकरण पुणे, यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. त्यांनी सदरहू कार्यक्रमाची अंमलबजावणी प्रचलित अटी व शर्तीच्या अधिन राहून करावी.

३. या योजनेअंतर्गत वरील मंजूर निधीतून विविध स्पर्धांचे आयोजन, सामाजिक वनिकि. ग्राम जागृती कार्यक्रम. प्रसिध्दी कार्यक्रमांतर्गत चर्चासत्र, वनमहोत्सव कार्यक्रम, वृक्षदिंडी कार्यक्रम, महत्वाचे विविध दिन साजरे करणे, एस.टी./रेल्वेचे माध्यमातून सामाजिक वनीकरणाची जाहिरात, दूरदर्शन/आकाशवाणीसाठी प्रायोजित कार्यक्रम तयार करुन त्याचे प्रसारण करणे, वनश्री पुरस्कार वितरण कार्यक्रम, इत्यादि कामे तसेच, उपसंचालक, सहा. संचालक, लागवड अधिकारी व सामाजिक वनीकरण मजूर यासाठी आणि शेतक-यांसाठी विविध प्रशिक्षणे घेण्याचे व निसर्ग शिक्षण केंद्र निर्मिती व तंत्रज्ञान हस्तांतरण इत्यादि कामे करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे हे राहतील. सदरहू निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. उपरोक्त निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास संचालक, सामाजिक वनीकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. जिल्हानिहाय तरतुद वितरणाची माहिती शासनास पाठविण्यात यावी. तसेच राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा व झालेल्या खर्चाचा तपशील देखिल शासनास सादर करण्यात यावा.

५. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.एल-३, २४०६ वनीकरण व वन्यजीवन ००१-संचालन व प्रशासन - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना- ००१ (०२) (०१) संचालक, सामाजिक वनीकरण व वनसंरक्षक (पुणे) (२४०६ १६४६)- २६ जाहीरात व प्रसिध्दी, ५०-इतर खर्च (प्रशिक्षण) योजनांतर्गत-दत्तमत**

६. वित्त विभागाने शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१०/प्र.क्र.६५ /२०१०/अर्थसंकल्प-३, दिनांक- ३ एप्रिल,२०१० अन्वये दिलेल्या अधिकारानुसार आणि प्रशासकिय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तिनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक **२०१००४१६१३२४३८००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

१६/४/१२

**( वि. रा. ठाकूर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,
संचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व सहसंचालक , सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर .
सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
महालेखापाल, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
कार्यासन अधिकारी, व्यय-१५,अर्थसंकल्प ३ व ४, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
कार्यासन अधिकारी, कार्यासन क्र.१४३२, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी (सर्व) , ग्रा.वि.व ज.सं.वि.,मंत्रालय,मुंबई-३२
निवडनस्ती/जल-१२.